श्री. राजेश्वर गोपालराव पाटील, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पालघर यांची मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांच्या आस्थापनेवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः आकृवि ०२१७/प्र.क्र. ५९ /१५अे
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
तारीख: ०८ सप्टेंबर, २०१७.

**शासन निर्णय :-**

श्री. राजेश्वर गोपालराव पाटील, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पालघर यांच्या सेवा मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांच्या आस्थापनेवरील जनसंपर्क अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने दोन वर्षाच्या कालावधीसाठी सक्षम प्राधिकरणाच्या मंजूरीने खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्री. राजेश्वर गोपालराव पाटील, ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला श्री. पाटील, आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

आ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीला शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

इ) जर त्यांची सेवा मा. अध्यक्ष, विधानसभा यांना आवश्यक वाटली नाही तर श्री. पाटील यांना मुळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा त्यांना राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी त्यांनी शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटील दिली पाहिजे; आणि

ई) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. श्री. नेरकर दिलीप शंकरराव, उपविभागीय कृषि अधिकारी, पालघर जि. पालघर यांना श्री. राजेश्वर गोपालराव पाटील, यांच्या प्रतिनियुक्तीने रिक्त होणाऱ्या जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पालघर या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत आहे.

३. श्री. राजेश्वर गोपालराव पाटील यांनी आपल्या पदाचा कार्यभार श्री. नेरकर दिलीप शंकरराव, उपविभागीय कृषि अधिकारी, पालघर जि. पालघर यांच्याकडे सोपवुन प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे व तसा अहवाल आयुक्त (कृषि) , महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०८१४४५५०९५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.09.08 15:18:02 +05'30'

**( सु.सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ प्रती )
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
४. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
५. उप सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. संबंधित विभागीय आयुक्त ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
७. संबंधित विभागीय कृषि सह संचालक ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
८. कृषि सह संचालक, आस्थापना, कृषि आयुक्तालय, पुणे
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१०. सर्व संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
११. निवड नस्ती /१५अे

**प्रतिलिपी,**

१२. मा.मंत्री ( कृषि ) / मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. मा.प्रधान सचिव ( कृषि ) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.